मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे Online Bilingual Journal (e-HCR) स्थापन करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
विधी व न्याय विभाग
शासन निर्णय क्रमांकः एचसीटी-५२२४/१९२/प्र.क्र. ३२/का.४
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६ जुलै, २०२४.

संदर्भ -

१. सदस्य सचिव, एआय असिस्टेड लिगल ट्रान्सलेशन समितीची क्र. Com/Sec/३२/२०२४, दि. २०/०२/२०२४, क्र. Com/Sec/७५/२०२४, दि. १९/०३/२०२४, क्र. Com/Sec/१०६/२०२४, दि. ०९/०५/२०२४ व क्र. Com/Sec/२२७/२०२४, दि. १२/०६/२०२४ रोजीची पत्रे.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, दि. २७/०४/२०२२.
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, दि. २७/०९/२०२२.

प्रस्तावना -

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या एआय असिस्टेट लिगल ट्रान्सलेशन ॲडवायजरी कमिटीच्या निर्देशास अनुसरुन, मा. मुंबई उच्च न्यायालयाने मा. सर्वोच्च न्यायालयाच्या तसेच मा. उच्च न्यायालयाच्या निकालांचे मराठी भाषेत भाषांतर करण्याचा उपक्रम हाती घेतला आहे. त्यानुषंगाने मा. सर्वोच्च न्यायालयाच्या एआय असिस्टेड लिगल ट्रान्सलेशन समितीने Online Bilingual Journal (e-HCR) स्थापन करण्याकरीता आवश्यक पायाभूत सुविधा पुरविण्याकरीता राज्य शासनाचे सहाय्य घेण्याबाबत सूचना जारी केल्या आहेत. त्यास अनुसरुन मा. उच्च न्यायालयात e-HCR स्थापन करण्याकरीता अपील शाखेच्या आस्थापनेवर आवश्यक पदे निर्माण करण्यास मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव उच्च न्यायालय प्रशासनाकडून उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या तसेच मा. उच्च न्यायालयाच्या निकालांचे मराठी भाषेत भाषांतर करण्याच्या उपक्रमाकरीता, मा. उच्च न्यायालयात Online Bilingual Journal (e-HCR) स्थापन करण्यासाठी पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे एकूण ४२ मनुष्यबळाच्या सेवा, प्रत्यक्ष कराराच्या दिनांकापासून एक वर्ष कालावधीकरीता बाहययंत्रणेव्दारे घेण्यास व त्याअनुषंगाने येणाऱ्या एकत्रित रु. २,८७,९८,५६०/- इतक्या वार्षिक अंदाजित खर्चास याअन्वये मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | मुख्य संपादक | ०१ |
| २ | संपादक (इंग्रजी व मराठी भाषेकरीता प्रत्येकी १) | ०२ |

| | | |
|---|---|---|
| ३ | उप संपादक | ०४ |
| ४ | सहायक संपादक | ०६ |
| ५ | सिस्टीम ॲनालिस्ट | ०१ |
| ६ | डेटा एंट्री ऑपरेटर (इंग्रजी व मराठी भाषेकरीता प्रत्येकी १०) | २० |
| ७ | Development of D-space Respository with searching public interface along with e-HCR software through an outsourced agency as one time activity | **०८**<br>(सिनियर डेव्हेलपर, डेव्हेलपर, सर्व्हर/क्लाऊड ॲडमिनिस्टर प्रत्येकी १ पद व प्रोग्रामर (सिनियर लेव्हल) ५ पदे) (ONE TIME ACTIVITY) |

२. सदर संवर्गाच्या सेवा बाहययंत्रणेव्दारे घेताना संदर्भाधीन शासन निर्णय, सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, दि. २७/०९/२०२२ व शासन निर्णय, वित्त विभाग, दि. २७/०४/२०२२ अन्वये विहित कार्यपध्दती व मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्यात यावे. त्याअन्वये शासन खर्चात २० ते ३० टक्के इतकी बचत होणे आवश्यक राहील.

३. बाहययंत्रणेव्दारे घेण्यात येणाऱ्या सदर मनुष्यबळ सेवांचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर राहणार नाही.

४. उपरोक्त तक्त्यातील अनुक्रमांक ७ येथे नमुद सेवेचे स्वरुप हे ONE TIME ACTIVITY पध्दतीचे राहील.

५. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र- जे .१, २०१४ - न्यायदान, (भारित) १०२-उच्च न्यायालये, (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा, (२०१४ ००९२) (अनिवार्य) १० कंत्राटी सेवा" या लेखाशिर्षाखाली संबंधित वित्तीय वर्षात निधी विहीत पध्दतीने अर्थसंकल्पित करण्यात येऊन भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५६३/व्यय-५, दि. २२/०५/२०२४ व अनौसं/३६७/आपुक, दि.१९/०६/२०२४ अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने तसेच उपसमितीच्या मान्यतेस अनुसरुन तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१६१७३६३४६७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2024.07.16 17:47:59 +05'30'

**( विलास वसंत गायकवाड )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महाप्रबंधक,उच्च न्यायालय ,मुंबई, मुंबई. (ई-मेलव्दारे)
२. सदस्य सचिव, एआय असिस्टेड लिगल ट्रान्सलेशन समिती, उच्च न्यायालय, मुंबई. (ई-मेलव्दारे)
३. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-एक, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
७. वित्त विभाग, व्यय ५/आ.पु.क. कक्ष, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन अधिकारी, का.२३/२४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती.